श्री. अ.अ. पेडगांवकर, सदस्य, मोटार
अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांच्या
पुनर्नियुक्तीनंतरची वेतननिश्चिती.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय, गृह विभाग क्र. एमसीटी०१०३/१७०/सीआर-७/परि-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ३० जानेवारी, २००४

वाचा : १) शासन अधिसूचना, गृह विभाग क्र. एमसीटी ०७०२/११३२/सीआर १९२/परि-५,दि.१८.९.२००२.
२) शासन अधिसूचना, गृह विभाग क्र. एमसीटी ०७०२/११३२/सीआर १९२/परि-५, दि. १०.१.२००३.
३) प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र.मोअदान्या/पुनिवेनि/ ११६/२००३, दिनांक १६.१.२००३.

<u>शासन निर्णय</u> :- श्री. अशोक अ. पेडगांवकर, यांची अतिरिक्त सह जिल्हा न्यायाधीश व अप्पर सत्र न्यायाधीश,अहमदनगर या पदावर कार्यरत असताना सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई या पदावर शासन अधिसूचना, गृह विभाग क्र. एमसीटी ०७०२/११३२/सीआर १९२/परि-५, दि.१८.९.२००२ अन्वये नियुक्ती करण्यात आली. श्री. अ. अ. पेडगांवकर हे न्यायिक सेवेतून वयाच्या ६० व्या वर्षी म्हणजेच दिनांक १२.०१.२००३ रोजी निवृत्त झाल्यामुळे दिनांक १३.०१.२००३ ते १२.०१.२००५ या कालावधीकरिता शासन अधिसूचना, गृह विभाग क्र. एमसीटी ०७०२/११३२/सीआर १९२/परि-५, दिनांक १०.१.२००३ अन्वये पुनर्नियुक्त करण्यात आले होते. तथापी श्री. पेडगांवकर यांचा दि.७.१०.२००३ पासून राजीनामा स्विकारला आहे.

श्री. अ.अ. पेडगांवकर यांची सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई या पदावर दि.१३.१.२००३ पासून पुनर्नियुक्ती करण्यात आली आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ च्या नियम १५७ (२) आणि त्या खालील टिप्पण्या व शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पुनिवे १०८९/४७९/सेवा-४, दि. १६ मार्च १९९० मधील तरतूदीस अनुसरुन पुनर्नियुक्तीनंतर त्यांची दि.१३.१.२००३ ते ६.१०.२००३ पर्यंतच्या कालावधीसाठी वेतन निश्चिती खालीलप्रमाणे करण्यात येत

आहे. ही वेतननिश्चिती त्यांच्या सुधारित वेतनश्रेणीतील वेतन निश्चितीच्या पडताळणीस तसेच त्यांच्या निवृत्तीवेतनास महालेखापाल, महाराष्ट्र राज्य यांच्या अंतीम प्राधिकृतीच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) श्री. अ.अ. पेडगांवकर यांचे दि. १२.०१.२००३ रोजी सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई या पदावरील अंतिम वेतन. | | : | रु. १६,३००/- |
| २) अधिक विशेष वेतन | (+) | : | रु. ८००/- |
| | | | रु. १७,१००/- |
| ३) वजा श्री. अ.अ. पेडगांवकर यांना तात्पुरत्या स्वरुपात परिगणित केलेले निवृत्तीवेतन. | (-) | : | रु. ७,५१४/- |
| ४) दि. १३.१.२००३ रोजी पुनर्नियुक्तीच्या तारखेस निश्चित होणारे वेतन. | | : | रु. ९,५८६/- |

३. श्री. अ.अ. पेडगांवकर हे त्यांना मिळालेल्या अंतिम वेतनावरील म्हणजेच रुपये १६,३००/- (रुपये सोळा हजार तीनशे फक्त) वर अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता व इतर भत्ते मिळण्यास दि.७.१०.२००२ ते १२.१.२००३ पर्यंत पात्र असतील. तथापि, पुनर्नियुक्तीच्या दि.१३.१.२००३ ते ६.१०.२००३ पर्यंतच्या कालावधीतील त्यांना निवृत्ती वेतनावरील महागाई भत्ता मिळणार नाही.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक बी-३ "२०४१, वाहनांवरील कर-८००, इतर खर्च ८०० (एक) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण (२०४१०१२५)" या लेखा शिर्षाखाली दाखवावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ च्या नियम १५७ (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आ. बा. कमाळे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्रान्वये),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
श्री. अ.अ. पेडगांवकर, सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
वित्त विभाग, सेवा-७/व्यय-८, मंत्रालय, मुंबई.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
विधी व न्याय विभाग, मुंबई.
निवडनस्ती / परिवहन-५.